श्री.छत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रुग्णालय, सोलापूर या संस्थेस सन-२०२४-२५ या वित्तीय वर्षात राज्य योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : यंत्रख-२०२४/प्र.क्र.२९०/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : १० जून, २०२४

**वाचा :**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III / उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०२१/प्र.क्र.८/ उद्योग-४, दिनांक ०७.०५.२०२१
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.डीएमईआर-२२०११/ १८६/२०२४-पीआरओसी१, दिनांक २२.०४.२०२४

**शासन निर्णय :**

विभागाच्या अधिपत्याखालील श्री.छत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रुग्णालय, सोलापूर या संस्थेच्या औषधवैद्यकशास्त्र व क्ष-किरणशास्त्र विभागातील रुग्णसेवेकरीता सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात राज्य योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून रुपये ३६,००,००,०००/- (रुपये छत्तीस कोटी फक्त) (सर्व करांसहीत) इतक्या किंमतीची खालील तक्त्यात नमूद यंत्रसामुग्री व साधनसामुग्री टर्न की सहीत खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नाव | नग संख्या | प्रती नग किंमत (सर्व करांसहित) | एकूण किंमत (सर्व करांसहित) |
|---|---|---|---|---|
| १ | Supply, Installation, Testing & Commissioning of Cardiac Operation Unit with Cathlab & Medical Equipments on Turnkey Basis | ०१ | ३६,००,००,००० | ३६,००,००,००० |
| | | | एकूण | ३६,००,००,००० |

अटी :-

१) सदर प्रशासकीय मान्यता सन २०२४-२५ या वित्तिय वर्षात संबंधित संस्थेस राज्य योजनेंतर्गत मंजूर व उपलब्ध निधीतून करण्यात येत आहे.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषंगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावेत. सदर दर हे बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने याबाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबतची खातरजमा आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

४) सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन पदनिर्मीतीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात यावी.

५) सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

६) प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी खात्री करावी.

७) मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

८) सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे.

१०) सदर यंत्रसामग्री टर्न की तत्वावर खरेदी करावयाची असल्याने या विभागाचा शासन निर्णय क्र.आयएचएन-२०१९/प्र.क्र.२९३/प्रशा-१, दिनांक : ०७ मार्च, २०१९ मधील कार्यपध्दती राबवून यंत्रखरेदी करण्यात यावी.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-०४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषम चिकित्सा-राज्ययोजनांतर्गत योजना |
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व श्रेणीवर्धन आणि यंत्रसामुग्री |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० १६२९) |

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६०७१८३१४८३११३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.06.10 19:20:34 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
२) महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
४) अधिष्ठाता, श्री.छत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रुग्णालय, सोलापूर
५) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
६) निवडनस्ती (प्रशा-१)